**मोटार वाहन विभागातील सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी संवर्गातील अधिका-यांना देण्यात आलेला मानीव दिनांक व त्याअनुषंगाने दिलेली पदोन्नती याबाबींची चौकशी करण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या समितीस मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः लवेसू-१११८/प्र.क्र.२४१/परि-४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
२ रा मजला, मंत्रालय (मुख्य इमारत)
तारीख: ०६ फेब्रुवारी २०१९

**वाचा-**

१) महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाचे पत्र क्र.३०४१८/म.वि.स./ई-२, दिनांक २७.११.२०१८.
२) महाराष्ट्र विधानपरिषद सभागृहात झालेल्या चर्चेचे दिनांक २९.११.२०१८ चे कार्यवृत्त.
३) शासनाचा समक्रमांकाचा दिनांक १४.१२.२०१८ रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र विधानमंडळाचे हिवाळी अधिवेशन २०१८ मध्ये मा. श्री. कपिल पाटील, वि.प.स. यांनी मोटार वाहन विभागातील सहाय्यक प्रादेशिक अधिकारी संवर्गातील अधिका-यांची ज्येष्ठतासूची, मानीव दिनांक व देण्यात येणा-या पदोन्नत्या याबाबत उपस्थित लक्षवेधी सूचना क्र. ७०१ वरील चर्चेच्यावेळी दिलेल्या आश्वासनाच्या अनुषंगाने चौकशी करण्यासाठी अतिरिक्त मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भ क्र. ३ वरील दि. १४.१२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये समिती गठीत केली होती. सदरहू समितीचा अहवाल सादर करण्यास देण्यात आलेली १ महिन्याची मुदत संपुष्टात आल्याने, प्रस्तुत समितीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय-**

हिवाळी अधिवेशन २०१८ मधील लक्षवेधी सूचना क्र. ७०१ वरील दिलेल्या आश्वासनानुसार गठीत समितीस विषयाची व्याप्ती विचारात घेता, त्यांचा अहवाल शासनास सादर करण्यास दि. १४.०१.२०१९ पासून तीन महिन्याची मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०६१७१८५८४५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM
DATTATRAY
HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032,
street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2019.02.06 17:20:47 +05'30'

**(द.ह.कदम)**
अवर सचिव, गृह (परिवहन) विभाग

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, परिवहन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. परिवहन उप आयुक्त (प्रशासन), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
६. निवडनस्ती/परिवहन-४.